आदिवासी क्षेत्र उपयोजना/ आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजनेंतर्गत सन २०१४-१५ साठी राज्यस्तरावरुन अर्थसंकल्पीत तरतूदीचे जिल्हानिहाय व योजनानिहाय वाटप "रस्ते व पूल"

## महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१४/प्र.क्र.२६/कार्यासन.६

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: २८ ऑगस्ट,२०१४

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०.१४/प्र.क्र.६६/अर्थ-३, दि.२९.३.२०१४
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अंदाज- २०.१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि.०१.०७.२०१४
३) आ.वि.वि ई ऑफीस नस्ती क्र.एमटीडी २६३६/७/२०१४/कार्यासन-५

**शासन निर्णय -**

आदिवासी उपयोजनांतर्गत **"रस्ते व पूल"** या उपशिर्षाखाली सन २०१४-१५ च्या अर्थसंकल्पीय अंदाजपत्रकात समाविष्ट करण्यात आलेल्या तरतुदीस अनुसरुन योजनानिहाय व जिल्हानिहाय वाटप आणि प्रत्येक योजानांचे नियंत्रण अधिकारी सोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविले आहेत.

२. सन २०१४-२०१५ करिताच्या अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी एप्रिल ते नोव्हेंबर, २०१४ या आठ महिन्यांचा खर्च भागविण्यासाठी विधान मंडळाने "महाराष्ट्र विनियोजन विधेयक २०१४" (महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) अधिनियम २०१४ यांच्या अनुसूचिच्या स्तंभ ४ मध्ये विर्निदिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह ) मंजूर केले आहे. सदर विधेयकाचे आता अधिनियमात रुपांतर झाले असुन ते महाराष्ट्र अधिनियम क्रं.१२ म्हणुन महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-८ दिनांक १८ जून, २०१४ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे. सोबतच्या विवरण पत्रातील स्तंभ क्रमांक २ मध्ये "रस्ते व पूल" या उपशिर्षाखाली सन २०१४-१५ या चालू आर्थिक वर्षाच्या पहिल्या आठ महिन्याकरिता अर्थसंकल्पीय तरतूदीच्या ६०% च्या मर्यादेत उपलब्ध तरतूद खर्च करण्यास शासन मान्यता देत आहे. यासाठी उपलब्ध करून देण्यात आलेली तरतूद एप्रिल,२०१४ ते नोव्हेंबर,२०१४ या आठ महिन्यांसाठी संगणक वितरण प्रणालीवर उपलब्ध कॅश फ्लो प्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी.

३. आदिवासी उपयोजनेंतर्गत सन २०१४-१५ या चालू आर्थिक वर्षा करीता उपलब्ध करून दिलेली तरतूद खालील नमुद केलेल्या अटींचा विचारात घेवुन वितरीत करण्यात यावी.

(अ) संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, यांचेकडून रस्त्याची कामे आदिवासी उपयोजना क्षेत्रात असल्याचे प्रमाणपत्र यांचेकडून प्राप्त करुन घेऊन व रस्त्याच्या कामांना प्रशासकीय मान्यता मिळाल्याची खात्री करुनच तरतूद वितरीत करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी यांची राहील.

(ब) सन २०१४-१५ या चालू आर्थिक वर्षात उपलब्ध करून दिलेल्या निधी पेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घ्यावी व सर्व संबंधितांना निर्देश द्यावेत. याची पुर्ण जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकारी यांची राहील.

४. नियंत्रण अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्रातील मान्यता असलेल्या रस्त्यांच्या कामावर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

५. आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लोकांकरिता वा आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लोकांकरिता खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत केलेली तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर किंवा सर्वसाधारण योजनेखाली खर्च करण्यात येवू नये. जर आदिवासी उपयोजनेत केलेली तरतूद खर्च झाली नाही तर सदर तरतूद प्रत्यार्पित करावी व कोणत्याही परिस्थितीत आदिवासी क्षेत्राबाहेर खर्च करण्यात येवू नये. जर आदिवासी उपयोजनेची तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर खर्च झालेली आढळल्यास याबाबत संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प व संबंधित अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ यांना जबाबदार धरण्यात येईल. तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत जिल्हा योजनांसाठी उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल लेखाशिर्षनिहाय/उप लेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती जिल्हाधिकारी तसेच नियोजन अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास व आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्यात १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

६. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्षात ठेवता येईल व तो केंद्रशासनाला कळविता येईल.

७. नियंत्रण अधिकारी/विभाग प्रमुख यांनी प्रचलित नियम प्रचलित कार्यपध्दती व सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन उपरोक्त परिच्छेद क्र.५ मधील सूचनानुसार खर्च करावा. हे आदेश फक्त

अंमलबजावणी /नियंत्रक अधिका-यांच्या अधिनस्त ठेवलेल्या तरतुदीस प्रशासकीय दृष्टया मान्य केलेल्या योजनांवर खर्च करण्यासाठी आहे. याची अंमलबजावणी अधिका-यांनी नोंद घ्यावी.

८. आदिवासी उपयोजनेअंतर्गत आदिवासी क्षेत्र उपयोजना (टिएसपी) व आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना (ओटिएसपी) यांचा खर्च स्वतंत्रपणे नोंदविण्यासाठी लेखाशिर्षामध्ये काही बदल करण्यात आले असल्यास हे बदल लक्षात घेवून खर्च नोंदविताना सुधारित लेखाशिर्ष नोंदविण्याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२७१०३०२०८८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Naik Suresh D
Digitally signed by Naik Suresh D
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=MTD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Naik Suresh D
Date: 2014.08.28 16:02:15 +05'30'

**( सु. द. नाईक )**
**कार्यासन अधिकारी**

प्रत,

१. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ नागपूर/ अमरावती/ ठाणे.
३. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक / अहमदनगर / नागपूर
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक / अहमदनगर / नागपूर
५. मुख्य लेखा व वित्तीय अधिकारी, नाशिक / अहमदनगर / नागपूर
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ / २, मुंबई / नागपूर.
८. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. कार्यासन अधिकारी का.क्र. २, व ५, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
१०. निवड नस्ती (का-६)

## आदिवासी क्षेत्र उपयोजनेखालील सन २०१४-१५ चे जिल्हानिहाय अंदाजपत्रकीय तरतूदीचे वाटप

| **शिर्ष : रस्ते व पूल.**<br>**योजनेचे नांव : जिल्हा रस्ते सर्वसाधारण.**<br>**(चालू/नवीन कामे)**<br>**(रुपये हजारात)** | | **मागणी क्रमांक टी : ५**<br>**मुख्य लेखाशिर्ष : ३०५४-रस्ते** व पूल-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना (०१) (०२) सर्वसाधारण (राज्य मार्ग निधी)<br>**(३०५४ ०४०७) २७-लहान बांधकामे** | | |
|---|---|---|---|---|
| **जिल्हयाचे नांव** | **२०१४-१५ साठी केलेली तरतूद** | **२०१४-१५ ची अर्थसंकल्पीय तरतूद सुपूर्द करण्यात आलेला नियंत्रक अधिकारी** | **प्रशासकीय विभाग** | **शेरा** |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| नाशिक | ४६७५० | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नाशिक | ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२. | |
| अहमदनगर | १२२५० | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद अहमदनगर | | |
| नागपूर | १००० | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नागपूर | | |
| **एकूण -** | **६००००** | | | |

--------------